आदिवासी सेवक/संस्था यांना पुरस्कार देण्याकरिता स्थापन केलेल्या निवड समितीची पुनर्रचना करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. आसेपु-२०१४/प्र.क्र.११९/का.१४**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- १८ जून, २०१५.

वाचा :- १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. आसेपु-१०९३/प्र.क्र.५४/का.५, दिनांक १३ सप्टेंबर, १९९४.
२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. आसेपु-१०९९/प्र.क्र.१५९/का.५, दिनांक ५ नोव्हेंबर, १९९९.
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. आसेपु-२००३/प्र.क्र.५६/का.१४, दिनांक १९ जानेवारी,२००४.
४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. आसेपु-२००५/प्र.क्र.०१/का.१४, दिनांक ७ जानेवारी,२००५.
५) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. आसेपु-२००५/प्र.क्र.०१/का.१४, दिनांक ३१ ऑक्टोबर,२००५.
६) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. आसेपु-२०१०/प्र.क्र.४/का.१४, दिनांक ११ ऑक्टोबर,२०१०.
७) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. आसेपु-२०१२/प्र.क्र.२०९/का.१४, दिनांक १८ नोव्हेंबर,२०१३.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्यात आदिवासींच्या सर्वांगीण विकासासाठी सातत्त्याने काम करणा-या कार्यकर्त्यांना व स्वयंसेवी सस्थांना प्रोत्साहन देण्याच्या उद्देशाने आदिवासी विकास विभागामार्फत “आदिवासी सेवक” व “आदिवासी सेवा संस्था” हा पुरस्कार दिला जातो. हा पुरस्कार देण्यासाठी योग्य उमेदवारांची /संस्थांची निवड करण्यासाठी मा.मंत्री (आ.वि.) यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भाधीन अ.क्र.(१) येथील शासन निर्णयाव्दारे राज्यस्तरीय समिती गठीत करण्यात यावी अशी तरतूद आहे. सदर तरतुदीनुसार संदर्भाधीन अ.क्र. ७ येथील शासन निर्णयान्वये ३ वर्षासाठी (ऑक्टोंबर, २०१६ पर्यंत ) समिती गठीत करण्यात आली होती. दरम्यान १४ वी विधानसभा विसर्जित झाल्याने दिनांक १८/११/२०१३ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेली विद्यमान निवडसमितीची पुनर्रचना करुन नवनियुक्त विधानसभा सदस्यांचा समावेश करुन नव्याने समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. आता सदर समितीची खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यात येत आहे:-

शासन निर्णय :-

“आदिवासी सेवक” व “आदिवासी सेवा संस्था” हा पुरस्कार देण्याकरिता राज्यस्तरीय निवड समितीची खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | सभासदांचे नांव/पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | मा.मंत्री (आदिवासी विकास) | अध्यक्ष |
| २ | मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) | उपाध्यक्ष |
| ३ | मा. प्रा. अशोक रामाजी उइके<br>( विधानसभा सदस्य, राळेगाव, जिल्हा यवतमाळ.) | सदस्य |
| ४ | मा. श्री. संजय हनवंतराव पुराम<br>( विधानसभा सदस्य आमगाव, जिल्हा गोंदिया. ) | सदस्य |
| ५ | मा. सचिव (आदिवासी विकास) | सदस्य |
| ६ | आयुक्त (आदिवासी विकास),नाशिक | सदस्य सचिव |

२. या समितीचा कालावधी पुढील तीन वर्षासाठी राहील.

३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक या कार्यालयाकडे पुरस्कारासाठी प्राप्त झालेले प्रस्ताव उपरोक्त समितीच्या मंजुरीसाठी सादर करतील.

४. सदर समितीचे कार्यक्षेत्र, अधिकार इ. बाबी शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टीएसपी-१०८३/४२/१२६५/का.१२, दिनांक ६ जून, १९८४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे राहील. तसेच समितीच्या सदस्यांना प्रचलित नियमानुसार प्रवासभत्ता अनुज्ञेय राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२०१२२४२२४०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Suresh D Naik

Digitally signed by Suresh D Naik
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh D Naik
Date: 2015.06.20 12:28:57 +05'30'

( सु. द. नाईक )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव
२) मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
३) मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
४) मा. प्रा. अशोक रामाजी उईके, विधानसभा सदस्य, राळेगाव, जिल्हा यवतमाळ
५) मा. श्री. संजय हनवंतराव पुराम, विधानसभा सदस्य, आमगाव, जिल्हा गोंदिया
६) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई
७) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई
८) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
९) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे

१०) अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक,नागपूर,अमरावती
११) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या.नाशिक
१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१४) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
१५) निवासी लेखा अधिकारी,मुंबई
१६) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
१७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई
१८) सर्व उपसचिव/अवर सचिव/कार्या. अधिकारी, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
१९) निवड नस्ती (का.१४), आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.